सिडकोच्या नवीन नांदेड प्रकल्पातील घरांच्या हस्तांतरणासंदर्भात समिती गठीत करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः विससू-२१२४/३७/प्र.क्र.११८/नवि -१०**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०७ एप्रिल, २०२५

**प्रस्तावना :-**

नांदेड शहराच्या नियोजनबध्द विकासाकरिता सिडकोची "विशेष नियोजन प्राधिकरण" म्हणून राज्य शासनाने दि.२६.९.१९७५ रोजीच्या अधिसूचनेन्वये नियुक्ती केली आहे. सिडकोने नांदेड प्रकल्पांतर्गत भौतिक, सामाजिक सुविधांसह आर्थिकदृष्टया दुर्बल घटक, अल्प उत्पन्न गट व मध्यम उत्पन्न गटाकरिता ०४ गृहनिर्माण योजना राबविल्या असून त्याअंतर्गत एकूण ७८८४ घरे बांधली असल्याचे प्रथमदर्शनी दिसून येते. सदरील घरे ६०/९० वर्षाकरीता दिर्घ मुदतीच्या भाडेपट्ट्याने लाभधारकांना देण्यात आलेली आहेत. सदर घरे मुळ वाटप धारकांनी सिडकोची पुर्व परवानगी न घेता परस्पर पब्लीक नोटरी अथवा मुद्रांकावर खरेदी विक्रीचा व्यवहार करुन घराचा ताबा खरेदीदारास दिलेला आहे. सिडको संचालक मंडळाचा ठराव क्र.९२०५, दि.२.५.२००५ अन्वये नांदेड प्रकल्पास मुळ मालकाच्या अनुपस्थितीत अटी व शर्तीस अधीन घरे हस्तांतरण करण्यास मान्यता देण्यात आली होती त्यानुसार सुमारे २७८ घरे हस्तांतरीत करण्यात आली आहेत. सदरील घरे खरेदीदाराच्या ताब्यात असून ती घरे सिडकोकडून हस्तांतरीत करुन मिळावीत अशी मागणी करण्यात येत आहे.

दरम्यान सिडकोच्या नवीन नांदेड प्रकल्पातील वाटप केलेली घरे मूळ मालकांनी बॉंड वर विक्री केल्याबाबत मा.श्री.मोहनराव हंबर्डे, वि.स.स. यांनी सन २०२४ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये लक्षवेधी क्र.७०० उपस्थित केली होती. सदर लक्षवेधी सूचनेवर दि.१.७.२०२४ रोजी विधानसभेमध्ये झालेल्या चर्चेदरम्यान मंत्री महोदयांनी दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने सिडको महामंडळाच्या स्तरावर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सिडकोच्या नवीन नांदेड प्रकल्पातील वाटप केलेली घरे मूळ मालकांनी बॉंड वर विक्री केल्यानंतर मुळ मालकाच्या अनुपस्थितीत सदर घरे हस्तांतरण करणे, या संदर्भात अभय योजना राबविणे तसेच इतर अनुषंगीक बाबींसंदर्भात शिफारशी शासनास सादर करण्यासाठी सह व्यवस्थापकीय संचालक-२, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | सह व्यवस्थापकीय संचालक (२), सिडको | अध्यक्ष |
| २) | जिल्हाधिकारी, नांदेड | सदस्य |
| ३) | आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४) | विषयाशी संबंधित तज्ञ व्यक्ती (सह व्यवस्थापकीय संचालक (२), सिडको यांनी त्यांच्या स्तरावर नियुक्ती करावी) | सदस्य |
| ५) | मुख्य प्रशासक, सिडको, छत्रपती संभाजीनगर | सदस्य सचिव |

**०२.** सदर समितीने सिडकोच्या नवीन नांदेड प्रकल्पातील वाटप केलेली घरे मूळ मालकांनी बॉंड वर विक्री केल्यानंतर मुळ मालकाच्या अनुपस्थितीत सदर घरे हस्तांतरण करणे, या संदर्भात अभय योजना राबविणे तसेच इतर अनुषंगीक बाबींसंदर्भातील शिफारशी २ महिन्यात सादर कराव्यात.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०७१५४७२४८२२५ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUBRAO NARAYAN SHINDE

Digitally signed by SUBRAO NARAYAN SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SUBRAO NARAYAN SHINDE
Date: 2025.04.07 15:48:25 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
३. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०.सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको), मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, नांदेड.
१३. आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका, नांदेड.
१४. मुख्य प्रशासक (नवीन शहरे), सिडको, छत्रपती संभाजीनगर.
१५. महासंचालक, माहिती व जन संपर्क महासंचालनायल, मुंबई.
१६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. महालेखापाल,(लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई/अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवड नस्ती (नवि-१०).